**कार्यकारी अभियंता(स्थापत्य) संवर्गातील**
**<u>अधिकाऱ्यांच्या बदल्या/नियुक्त्या.</u>**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन आदेश क्र. एलटीएस-१११९/(२७४/२०११)/भाग-१/आ (वर्ग-१).....(१५)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०६.०९.२०११

वाचा :शासन आदेश क्र. एलटीएस- १११९/(१६८/२०११)-आ (वर्ग-१)...(१७),दिनांक ३१.०५.११

**<u>आदेश</u>**

संदर्भाधीन दि. ३१.०५.२०११ च्या आदेशान्वये **श्री.म.आ.कमलाकर, कार्यकारी अभियंता, म्हैसाळ पंपगृह विभाग क्र.१, सांगली** यांची बदलीने नियुक्ती **कार्यकारी अभियंता, नियोजन व संकल्पचित्र विभाग, दापोडी, पुणे** या पदावर करण्यात आली होती. आता सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकिय सोईच्या दृष्टीने बदलीच्या अधिनियमातील कलम ४(४) व ४(५) नुसार त्यांचे नियुक्तीत अंशतः बदल करुन त्यांची सुधारित नियुक्ती **कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद सांगली** या श्री.नं.मु.वाघ यांच्या बदलीने होणाऱ्या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री.कमलाकर यांच्या बदलीने होणाऱ्या रिक्त पदावर अन्य अधिकाऱ्याच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येत आहेत.

३. श्री.कमलाकर यांची पदस्थापना ही त्यांच्या विनंतीनुसार होत असल्याने, त्यांना पदग्रहण अवधी व प्रवास भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०९०६१६५२३५००१** असा आहे.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

०६/०९/११

**(डॉ.माधव वीर)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :-

प्रधान सचिव (ग्राम विकास व जलसंधारण), मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (जलसंपदा)/सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग, / सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंते व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली
संबधित जिल्हा कोषागार अधिकारी,
खाजगी सचिव, मा. मंत्री जलसंपदा (कृ.खो.पा.मं. वगळून), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळ),मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
श्री.म.आ.कमलाकर, कार्यकारी अभियंता
सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने - दक्षता-१/दक्षता-२/दक्षता-३ / गोपनीय शाखा (२ प्रती), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.